महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ मधील जिल्हा आरोग्य अधिकारी संवर्गातील बदल्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन आदेश क्रमांकः बदली-२०२१/प्र.क्र.२२२/सेवा-२**
गो.ते.रुग्णालय इमारत,१० मजला, ए विंग,
मंत्रालय, मुंबई -४०० ००१
दिनांक : २१ जानेवारी, २०२२

**शासन आदेश -**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४ (४), ४ (५) आणि कलम ६ मधील तरतुदीनुसार सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ (वेतनस्तर एस-२३ : ६७७००-२०८७००) मधील जिल्हा आरोग्य अधिकारी संवर्गातील अधिकाऱ्यांच्या खालीलप्रमाणे बदलीने पदस्थापना करण्यात येत आहेत.:-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नांव व सध्याची पदस्थापना | बदलीने पदस्थापना |
|---|---|---|
| ०१. | डॉ. गोविंद पंडीत चौधरी, साथरोग शास्त्रज्ञ, आरोग्य व कुटुंब कल्याण प्रशिक्षण केंद्र, नाशिक | जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, नंदुरबार (रिक्त पदी) (ज्येष्ठतेनुसार) |
| ०२. | डॉ. राहुल नारायणराव गिते, अतिरिक्त जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, परभणी | जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, परभणी (रिक्त पदी) (ज्येष्ठतेनुसार) |
| ०३. | डॉ. दावल श्रीहरी साळवे, जिल्हा माता बालसंगोपन अधिकारी, नागपूर | जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, गडचिरोली (रिक्त पदी) (ज्येष्ठतेनुसार) |
| ०४. | डॉ. मिलींद शंकरराव सोमकुंवर, अतिरिक्त जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, चंद्रपूर | जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, भंडारा (रिक्त पदी ) (ज्येष्ठतेनुसार) |
| ०५. | डॉ. नितीन सोपानराव वानखेडे, अतिरिक्त जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, भंडारा | जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, गोदिंया (रिक्त पदी ) (ज्येष्ठतेनुसार) |
| ०६. | डॉ. प्रल्हाद सदाशिव चव्हाण, अतिरिक्त जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, यवतमाळ | जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, यवतमाळ (रिक्त पदी) (ज्येष्ठतेनुसार) |
| ०७. | डॉ. मनीराम मखाराम राठोड, सहायक संचालक, आरोग्य सेवा (कुष्ठरोग ), अकोला | जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, बुलढाणा (रिक्त पदी) ( विनंतीनुसार ) |
| ०८. | डॉ. रामेश्वर जनार्दन पराडकर, सहायक संचालक, आरोग्य सेवा (कुष्ठरोग), गोदिंया | जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, वर्धा (रिक्त पदी) ( प्रशासकीय कारणास्तव ) |
| ०९. | डॉ. दिलीप काशिनाथ माने, सहायक संचालक, आरोग्य सेवा (क्षयरोग ), पुणे | जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, सांगली ( रिक्त पदी ) ( विनंतीनुसार ) |
| १०. | डॉ. संजीवकुमार मनोहरराव जाधव, सहायक संचालक, आरोग्य सेवा, पुणे | सहायक संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई (रिक्त पदी) (विनंतीनुसार) |
| ११. | डॉ. आर. एन. खंडागळे, सहायक संचालक, आरोग्य सेवा (कुष्ठरोग) , भंडारा | सहायक संचालक, आरोग्य सेवा (कुष्ठरोग), अहमदनगर (रिक्त पदी) (विनंतीनुसार) |

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नांव व सध्याची पदस्थापना | बदलीने पदस्थापना |
|---|---|---|
| १२. | डॉ. अमोल रामभाऊ गिते, प्राचार्य, आरोग्य व कुटुंब कल्याण प्रशिक्षण केंद्र, औरंगाबाद | जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, बीड (रिक्त पदी) (विनंतीनुसार) |
| १३. | डॉ. मनिष रेंगे, जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, ठाणे | सहायक संचालक, आरोग्य सेवा (कुष्ठरोग), मुलुंड, मुंबई (रिक्त पदी) ( विनंतीनुसार ) |
| १४. | डॉ. गंगाधर परगे, जिल्हा आरोग्य अधिकारी संवर्ग ( सध्या पदस्थापनेविना ) | जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, ठाणे (डॉ. रेंगे यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदी) ( प्रशासकीय कारणास्त्व ) |
| १५. | डॉ. अविनाश नथुराम आहेर, जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, वाशिम | जिल्हा क्षयरोग अधिकारी, अहमदनगर. (विनंतीनुसार) |
| १६. | डॉ. सुहास कृष्णा कोरे, जिल्हा माता व बाल संगोपन अधिकारी, यवतमाळ | जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, वाशिम. (डॉ. आहेर यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदी) (ज्येष्ठतेनुसार) |

२. डॉ. अविनाश आहेर यांना डॉ. सुनिल पोटे, जिल्हा क्षयरोग अधिकारी, अहमदनगर यांच्या जागी बदलीने पदस्थापना देण्यात आली आहे. सदर पदावरून डॉ. पोटे यांना त्वरीत कार्यमुक्त करण्यात येऊन डॉ. आहेर यांना हजर करून घ्यावे. डॉ. पोटे यांच्या पदस्थापनेचे आदेश यथावकाश निर्गमित करण्यात येणार असल्याने व ते पदस्थापनेविना राहणार असल्याने पुढील आदेशापर्यंत डॉ. पोटे हे उपसंचालक, आरोग्य सेवा नाशिक मंडळ, नाशिक या कार्यालयात हजर होतील व त्यांचे मुख्यालय तेच राहील.

३. बदली करण्यात आलेल्या अधिकाऱ्यास त्यांच्या नवीन पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होण्याकरीता तात्काळ कार्यमुक्त करण्यात यावे आणि संबंधित अधिकाऱ्याने त्यांना दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी त्वरीत हजर होऊन त्याबाबतचा अहवाल संचालक, आरोग्य सेवा मुंबई यांना व शासनास सादर करावा.

४. बदली झालेल्या अधिकाऱ्यांना कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करण्यात येऊ नये, अन्यथा रजा मंजूर करणाऱ्या सक्षम प्राधिकाऱ्याविरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल.

५. बदली झालेल्या अधिकाऱ्यांनी त्यांना कार्यमुक्त केल्यानंतर, अनुज्ञेय पदग्रहण अवधीत नवीन पदस्थापनेवर रुजू व्हावे, जे अधिकारी या कालमर्यादेचे पालन करणार नाहीत आणि पदस्थापनेच्या ठिकाणी हजर न होता परस्पर गैरहजर राहतील, अशा अधिकाऱ्यांची अनुपस्थिती “अनधिकृत अनुपस्थिती” म्हणून समजण्यात येईल व पर्यायाने त्यांच्या सेवेत खंड होईल याची जाणीव सर्व संबंधितांना करुन देण्यात येत आहे.

६. जे अधिकारी त्यांच्या पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होणार नाहीत त्यांचेविरुध्द आयुक्तालयाने वेळीच प्रशासकीय कारवाई सुरु करावी व आवश्यकतेनुसार प्रस्ताव शासनाच्या मान्यतेसाठी सादर करावा. या प्रकरणी वेळोवेळी शासनास अवगत करावे व अनुपालन अहवाल शासनास विहित कालमर्यादेत सादर करावा.

७. बदलीच्या आदेशात बदल करुन घेण्यासाठी कोणत्याही अधिकाऱ्याने प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास असे अधिकारी शिस्तभंग विषयक कारवाई करण्यास पात्र ठरतील.

८. सदर आदेश तात्काळ अंमलात येतील.

९. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०११९१८२४०२८७१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Chandrakant
Haridas Wade

Digitally signed by Chandrakant Haridas Wade
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justice & Special Assist Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7a8cb09a73bc92b24a171080ebd81893480c90bedd57685ea1ce3af533f64bce, serialNumber=9474e7143b2bc3fd96e8d7bf07d1ce51de8461d4c34ae1e3f643c11b54523936, cn=Chandrakant Haridas Wade
Date: 2022.01.21 12:49:05 +05'30'

(चंद्रकांत ह. वडे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
२) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
३) संचालक, आरोग्य सेवा(१/२), मुंबई /पुणे.
४) अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा (सर्व)
५) सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), मुंबई
६) उपसंचालक, आरोग्य सेवा (सर्व)
७) जिल्हा शल्य चिकित्सक, सामान्य रुग्णालय (सर्व)
८) जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
९) महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र - १ , मुंबई /महाराष्ट्र - २, नागपूर
१०) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र - १ , मुंबई /महाराष्ट्र - २, नागपूर
११) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
१२) मा. मुख्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक
१३) मा.मंत्री (आरोग्य) / मा.राज्यमंत्री (आरोग्य) यांचे खाजगी सचिव
१४) अपर मुख्य सचिव, सा. आ. विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
१५) संबंधित अधिकारी (संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांचेमार्फत)
१६) निवड नस्ती (सेवा-२)